**जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत राबविण्यात येणा-या नाविन्यपूर्ण योजनेंतर्गत जे.सी.बी., पोकलेन मशीन, टिप्पर, हायड्रॉलीक ट्रॅक्टर इत्यादीची खरेदी करण्याबाबत . .**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : डिएपी-२०१५/प्र.क्र.७७/ का.१४८१-अ**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २१ ऑक्टोबर, २०१५.

**वाचा :- (१)** शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. जलअ-२०१४ / प्र.क्र. २०३/ जल-७, दि.५ डिसेंबर, २०१४

**(२)** शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. डिएपी-२०१४/प्र.क्र.१९८/का.१४८१ , दि.२७ ऑगस्ट, २०१४.

**(३)** शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र.डिएपी-२०१५/प्र.क्र.२३ /का.१४८१, दि.११ मार्च, २०१५.

**प्रस्तावना:**

राज्यातील बहुतांश भाग कोरडवाहू व अवर्षणग्रस्त असून, राज्यात गेल्या कांही वर्षामध्ये टंचाई परिस्थिती वारंवार उद्भवत आहे. त्यामुळे राज्यातील पाणी टंचाईच्या परिस्थितीवर मात करण्याच्या दृष्टीने उपाययोजना करण्यासंदर्भात, " सर्वांसाठी पाणी - टंचाई मुक्त महाराष्ट्र सन २०१९" अंतर्गत टंचाई परिस्थितीवर कायम स्वरूपी मात करण्यासाठी राज्यात "जलयुक्त शिवार अभियान" हा महत्वाकांक्षी कार्यक्रम राबविण्याचा निर्णय शासनाने संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. जलअ-२०१४ /प्र.क्र. २०३/ जल-७, दि.५ डिसेंबर, २०१४ अन्वये घेतला आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१४ नुसार त्यातील नमूद बाबींसाठी जिल्हा वार्षिक योजनेमध्ये राबविण्यात येणाऱ्या नाविन्यपूर्ण योजनेचा निधी वापरण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच जिल्हा वार्षिक योजनेतून सदर अभियानासाठी निधी उपलब्ध करून देण्याबाबत शासनाने संदर्भ क्र. (३) येथील शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र.डिएपी-२०१५/प्र.क्र.२३ /का.१४८१,दि.११ मार्च, २०१५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. या अभियानांतर्गत जे.सी.बी. यंत्राचा वापर करून तलावातील गाळ काढणे, नाला खोलीकरण, रूंदीकरण करणे इत्यादी विविध स्वरूपाची कामे करण्यास अनुमती देण्यात

आली आहे. तथापि, काही ठिकाणी सदरची कामे करण्यासाठी जे.सी.बी., पोकलेन मशीन, टिप्पर, हायड्रॉलीक ट्रॅक्टर इत्यादी खाजगी व्यावसायिकांकडून भाडेतत्वावर उपलब्ध होत नाही, असे निदर्शनास आले आहे.

२. शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. डिएपी-२०१४/प्र.क्र.१९८/का.१४८१ , दि.२७ ऑगस्ट, २०१४ सोबतच्या परिशिष्ट "अ" मधील परिच्छेद ५ मधील अ.क्र. (VII)नुसार "नाविन्यपूर्ण योजनेतून कोणत्याही स्वरूपाची वाहन खरेदी अनुज्ञेय नाही." तथापि, "जलयुक्त शिवार अभियान" कार्यक्रमाची उपयुक्तता व महत्व विचारात घेता आणि जे.सी.बी., पोकलेन मशीन, टिप्पर, हायड्रॉलीक ट्रॅक्टर इत्यादी ही यंत्रसामग्री खाजगी व्यावसायिकांकडून भाडेतत्वावर उपलब्ध होऊ शकत नसल्यास, "जलयुक्त शिवार अभियान" कार्यक्रम यशस्वीपणे राबविण्यासाठी जे.सी.बी., पोकलेन मशीन, टिप्पर, हायड्रॉलीक ट्रॅक्टर इत्यादी ही यंत्रसामग्री जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत राबविण्यात येणा-या नाविन्यपूर्ण योजनेतून आवश्यकतेनुसार खरेदी करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

"जलयुक्त शिवार अभियान" हा कार्यक्रम यशस्वीपणे राबविण्यासाठी जिल्हा वार्षिक योजने अंतर्गत राबविण्यात येणा-या नाविन्यपूर्ण योजनेचा निधी वापरण्यास संदर्भाधीन दि. ५/१२/२०१४ व दि. ११/३/२०१५ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असल्याने, शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. डिएपी-२०१४/प्र.क्र.१९८/का.१४८१ , दि.२७ ऑगस्ट, २०१४ सोबतच्या परिशिष्ट "अ", परिच्छेद ५ मधील अ.क्र. (VII) मध्ये खालील अटीच्या अधिनतेने खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास "एक विशेष बाब" म्हणून शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

"जलयुक्त शिवार अभियान" कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी जे.सी.बी., पोकलेन मशीन, टिप्पर, हायड्रॉलीक ट्रॅक्टर इत्यादी आवश्यक यंत्रसामग्री भाडेतत्वावर उपलब्ध होत नसल्यास, तसे संबंधित यंत्रणेने प्रमाणित केल्याची खातरजमा जिल्हाधिकारी यांनी केल्यावर, सदर यंत्रसामग्री जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत राबविण्यात येणा-या नाविन्यपूर्ण योजनेतून खरेदी

करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. मात्र, सदर यंत्रसामग्री आवश्यकतेनुसार वाजवी प्रमाणात खरेदी करण्यात यावी. सदर मान्यता ही " जलयुक्त शिवार अभियान" कार्यक्रमापुरतीच मर्यादीत असून सदर मान्यता ३१ मार्च, २०१९ पर्यंत लागू राहील. व त्यानंतर आपोआप संपुष्टात येईल. तसेच सदर यंत्रसामग्री प्रचलित नियमानुसार व ई- निविदा पध्दतीने खरेदी करण्यात यावी.

३. उपरोक्त यंत्रसामग्रीची मागणी ज्या यंत्रणेने केली आहे त्या यंत्रणेकडे त्याची मालकी राहील व त्या यंत्रणेने सदर यंत्रसामग्रीसाठी लागणारे इंधन,वंगण, देखभाल-दुरूस्ती व चालकाचा खर्च इत्यादी अनुषंगिक आवर्ती स्वरुपाचा खर्च करणे बंधनकारक राहिल. कोणत्याही परिस्थीतीत किंवा अपवाद म्हणून जिल्हा वार्षिक योजना व जिल्हा वार्षिक योजनेच्या नाविन्यपूर्ण योजनेतून या प्रयोजनासाठी खर्च करता येणार नाही.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२११४५०१४६५१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kirankumar Vasantrao Wahul

Digitally signed by Kirankumar Vasantrao Wahul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Vasantrao Wahul
Date: 2015.10.21 17:04:23 +05'30'

**( कि. व . वाहुल )**
शासनाचे उपसचिव

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद व संसद सदस्य.
५) सर्व सन्माननीय विधानसभा /विधान परिषद सदस्य,
६) मा. राज्यमंत्री ( नियोजन )
७) सर्व मा. मंत्री, मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
८) मा. मुख्य सचिव,

९) अपर मुख्य सचिव ( नियोजन ) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक,
१०) सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) आयुक्त ( कृषी ) , कृषी आयुक्तालय, पुणे,
१२) विभागीय आयुक्त (सर्व )
१३) जिल्हाधिकारी (सर्व )
१४) प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन उपयोजन केंद्र, नागपूर
१६) जिल्हा नियोजन अधिकारी ( सर्व )
१७) महालेखापाल महाराष्ट्र - १ व २ ( लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई / नागपूर
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१९) कक्ष अधिकारी , ( १४८१) नियोजन विभाग. मंत्रालय, मुंबई.
२०) निवड नस्ती, (का. १४८१-अ). नियोजन विभाग.

=======